मा.राज्यपालांनी सन २००९-१० करीता
दिलेल्या निर्देशात सूचित केल्याप्रमाणे
उच्च व तंत्र शिक्षणातील अनुशेष दूर
करण्याकरीता संनियंत्रण समिती
गठीत करण्याबाबत

महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक :विसआ-२००९/(प्र.क्र. १७०/ ०९)/तांशि-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ५ डिसेंबर,२००९

प्रस्तावना :

मा. राज्यपाल महोदयांनी विदर्भ, मराठवाडा व उर्वरीत महाराष्ट्र विकास मंडळ, आदेश १९९४ मधील पोट कलम ७ अन्वये दिनांक २७ मे, २००९ रोजी वार्षिक योजना २००९-१० करीता दिलेल्या निदेशात उच्च व तंत्र शिक्षण विभागातील तंत्र शाळेतील विद्यार्थ्यांच्या जागेच्या अनुशेषाबाबत चिंता व्यक्ती केली आहे. मा. राज्यपालांच्या असेही निदर्शनास आले आहे की, तंत्रशाळा, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, वसतीगृहे व तंत्रनिकेतन इमारतीच्या बांधकामासाठी नियोजन, वित्त , सार्वजनिक बांधकाम विभाग व उच्च व तंत्र शिक्षण विभागामध्ये समन्वय असणे आवश्यक आहे. याकरीता प्रधान सचिव (नियोजन) यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्याचे सूचित केले आहे. त्यानुसार एक समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करुन मा. राज्यपाल महोदयांच्या निर्देशानुसार (सोबत प्रत जोडली आहे) उच्च व तंत्र शिक्षण विभागातील अनुशेष दूर करण्यासाठी सर्वंकष कामनिहाय कार्यक्रम निश्तिच करण्यासाठी, त्याची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| प्रधान सचिव | नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| प्रधान सचिव | वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| प्रधान सचिव | उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| सचिव | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| संचालक | व्यवसाय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| संचालक | व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण , महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| संचालक | तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य सचिव |

२. सदर समितीने मा. राज्यपालांनी दिलेल्या निर्देशानुसार सुनिश्चित कालावधीमध्ये उच्च व तंत्र शिक्षण विभागाचा अनुशेष दूर करण्याकरीता कालबध्द कार्यक्रम नियश्चित करावा आणि या कार्यक्रमांनुसार अंमलबजावणी करुन संनियंत्रण करावे.

३. सदर समिती कामकाजाचा प्रगतीचा आढावा प्रत्येक महिन्याला घेईल आणि त्याचा प्रगती अहवाल मा. राज्यपाल महोदयांना माहितीसाठी सादर करील

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(वि.भा.सोनावणे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/कक्ष अधिकारी,
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई.
संचालक, तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, व्यवसाय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
निवड नस्ती तांशि-३